**राज्यातील विविध व्यावसायीक पाठयक्रमांत शिकणाऱ्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना मिळणाऱ्या निर्वाह भत्त्याच्या दरात सुधारणा करणे.**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक - आवगृ-१२०४/प्र.क्र.१८/का.१२,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २४ ऑगस्ट, २००४.

वाचा :- १) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्रमांक इबीसी-१०८८/१०७२१/प्र.क्र.७६/का.१२, दिनांक ९ ऑगस्ट, १९८९.
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांक इबीसी-२००३/प्र.क्र.३११/मावक-२, दिनांक ९ जून, २००३.

प्रस्तावना :- वैद्यकीय, अभियांत्रिकी, कृषि, पशुवैद्यकीय, वास्तुशास्त्र इत्यादी व्यावसायीक अभ्याक्रमातील महाविद्यालयालयामध्ये शिक्षण घेणाऱ्या व वसतिगृहात राहणाऱ्या अनुसूचित जमाती मधील विद्यार्थ्यांना भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिक्षवृत्ती या योजनेतंर्गत विद्यार्थ्यांना रुपये १९०/- ते रुपये ४२५/- निर्वाह भत्ता दिला जातो. शिष्यवृत्तीद्वारे मिळणाऱ्या निर्वाह भत्त्यातून विद्यार्थ्यांना व्यावसायीक पाठयक्रमाची पुस्तके, निवास, भोजन, स्टेशनरी इ. बाबींचा खर्च भागवावा लागतो. तथापि, याबाबतचा सर्व खर्च या निर्वाह भत्त्यातून ते भागवू शकत नाहीत. म्हणून व्यवसायिक पाठ्यक्रमाशी संलग्न वसतिगृहात राहणाऱ्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना संदर्भातील अनुक्रमांक १ येथे नमूद केलेल्या दिनांक ९ ऑगस्ट, १९८९ रोजीच्या शासन निर्णयान्वये दरमहा रु.१००/- इतका पुरक भत्ता मंजूर करण्यात आलेला आहे. परंतु भारत सरकार शिष्यवृत्ती आणि वरीलप्रमाणे मिळणाऱ्या निर्वाहभत्यावर संपूर्ण अभ्यासक्रम पूर्ण करणे विद्यार्थ्यांच्या आर्थिक परिस्थितीमूळे शक्य होत नाही.

२. व्यावसायीक पाठयक्रमाशी संलग्न असणाऱ्या शासकीय वसतीगृहात राहणाऱ्या तसेच वसतिगृहाबाहेर राहणाऱ्या अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांकरीता शासनाने संदर्भातील अनुक्रमांक-२ येथे नमूद केलेल्या दिनांक ९ जून, २००३ रोजीच्या शासन निर्णयान्वये भारत सरकार शिष्यवृत्तीच्या निर्वाह भत्त्याव्यतिरिक्त मिळणाऱ्या निर्वाह भत्त्याचे दर सन २००३-०४ या वर्षापासून सुधारित केले आहेत. याच धर्तीवर राज्यातील विविध अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतलेल्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना निर्वाह भत्त्याचे सुधारित दर लागू करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता. या प्रस्तावास मंत्रिमंडळाने दिनांक १८ ऑगस्ट, २००४ रोजीच्या बैठकीत मंजूरी दिली आहे.

<u>शासन निर्णय</u> :- मंत्रिमंडळाने दिलेल्या मंजूरीनुसार राज्यातील विविध अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतलेल्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना द्यावयाच्या निर्वाह भत्त्याचे सुधारित दर सन २००४-२००५ या वर्षापासून खालीलप्रमाणे लागू करण्यास शासन मंजूरी देत आहे :-

| अ. क्र. | अभ्यासक्रम | वसतिगृहात राहणाऱ्या विद्यार्थ्यांकरिता निर्वाह भत्त्याचा प्रतिमाह दर | कालावधी | एकूण | वसतिगृहात न राहणाऱ्या विद्यार्थ्यांकरिता निर्वाह भत्त्याचा प्रतिमाह दर | कालावधी | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| | **चार ते पाच वर्षाचे अभ्यासक्रम :-** | | | | | | |
| १ | वैद्यकीय/ अभियांत्रिकी/ कृषि / पशु वैद्यकीय वास्तुशास्त्र इ. | रु. ७०० | १० महिने | रु.७०००/- | रु.१०००/- | १० महिने | रु.१००००/- |
| | **दोन ते तीन वर्षाचे अभ्यासक्रम :-** | | | | | | |
| १ | अभियांत्रिकी पदवीका, एम.बी.ए., एम.एस. डब्ल्यू. इत्यादि | रु.५००/- | १० महिने | रु.५०००/- | रु.७००/- | १० महिने | रु.७०००/- |
| | **दोन वर्षे किंवा त्यापेक्षा कमी कालावधीचे अभ्यासक्रम :-** | | | | | | |
| १ | बी.एड., डी.एड.इ. | रु.५००/- | १० महिने | रु.५०००/- | रु. ५००/- | १० महिने | रु.५०००/- |

२. व्यावसायिक पाठ्यक्रमाशी संलग्न असणाऱ्या वसतिगृहात राहणाऱ्या तसेच वसतिगृहाबाहेर राहणाऱ्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांसाठी लागू करण्यात येत असलेले निर्वाह भत्त्याचे सुधारित दर सोबत जोडलेल्या परिशिष्ट "अ" व "ब" मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहतील. तसेच हा निर्वाह भत्ता भारत सरकार शिष्यवृत्ती अंतर्गत मिळणाऱ्या निर्वाह भत्त्याव्यतिरिक्त राहील.

३. यावर होणारा खर्च "मागणी क्र. टी-४ -२२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयाचे कल्याण, ०१-अनुसूचित जातीचे कल्याण, २७७ शिक्षण, (१०) व्यावसायीक महाविद्यालयाशी संलग्न केलेल्या वसतीगृहातील अनुसूचित जमातीतील विद्यार्थ्यांना निर्वाहभत्ता देणे-

(०१) राज्य योजनांतर्गत योजना ( २२२५ २२०१) " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येवून हा खर्च सदर योजनेसाठी सन २००४-०५ मध्ये उपलबध होणाऱ्या मंजूर तरतूदीतून तसेच प्रतीवर्षी करण्यात येणाऱ्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( ज. ल.पावरा )
अवर सचिव

प्रति,

मा.राज्यपालांचे सचिव.
मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव.
मा. मंत्री आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव.
मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव.
अपर मुख्य सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधीद्रव्ये विभा, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव ( कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव ( पदुम) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
उपसंचालक, तंत्रशिक्षण, सर्व विभार्गीय कार्यालये.
संचालक, वैद्यकीय शिक्षण व औषधीद्रव्ये विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व अधिष्ठातना, वैद्यकीय महाविद्यालये.
सर्व प्राचार्य, अभियांत्रिकी महाविद्यालये / सर्व प्राचार्य तंत्रनिकेतने.
सर्व कृषि विद्यापिठे./ सर्व विद्यापिठे.
सर्व जिल्हाधिकारी.
अपर आयुक्त, आदिवासी विकास,ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर.
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
मा. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्विय सहाय्यक.
सर्व सहसचिव/उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
आदिवासी विकास विभागातील सर्व कार्यासने.
निवड नस्ती. का.१२.

## परिशिष्ट -अ

**शासन निर्णय क्रमांक -आवगृ-१२०४/प्र.क्र.१८/का.१२. दिनांक24ऑगस्ट. २००४ चे सहपत्र.**

**व्यावसायीक पाठयक्रमाशी संलग्न असणा-या वसतिगृहात राहणाऱ्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना सुधारित निर्वाह भत्ता योजनासंदर्भातील अटी व शर्ती.**

(१) **सुधारित निर्वाह भत्ता योजनेच्या अटी व शर्ती खालीलप्रमाणे राहतील.**

1. विद्यार्थी व्यावसायीक पाठयक्रमात प्रवेशित असावा.
2. विद्यार्थी भारत सरकार शिष्यवृत्तीधारक असावा.
3. भारत सरकार शिष्यवृत्ती योजनेस जी उत्पनाची मर्यादा आहे, तीच मर्यादा या योजनेस लागू राहील. ( रुपये १,००,०००/-) व पुढे जसजसी भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजनेच्या उत्पन्न, मर्यादेत वाढ होईल त्याप्रमाणे आपोआपच लागू राहील.
4. व्यावसायीक पाठयक्रमात शिकत असणाऱ्या विद्यार्थ्यांनी प्रथम त्यांच्या महाविद्यालयाच्या वसतिगृहामध्ये प्रवेश घेणे बंधनकारक आहे. तथापि, त्या ठिकाणी जर जागा उपलब्ध नसेल तर संबंधित वसतिगृहाच्या अधिक्षकाकडून/रेक्टरकडून लेखी प्रमाणपत्र घ्यावे त्यानंतर शासकीय वसतिगृहामध्ये प्रवेश दिला जाईल.
5. प्रथम वर्षासाठी सक्षम अधिकाऱ्यांने दिलेले जातीचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील.
6. अनुत्तीर्ण विद्यार्थी त्या वर्षापूरता या योजनेचा लाभ मिळण्यास अपात्र ठरेल.
7. स्थानिक विद्यार्थी किंवा स्वत:च्या घरी राहणारा विद्यार्थी या योजनेतंर्गत लाभ घेण्यास पात्र असणार नाही.
8. जातीचा अथवा उत्पनाचा दाखला चूकीचा आढळल्यास संबंधित लाभधारक विद्यार्थी फौजदारी गुन्हयास पात्र राहील व लाभधारकाने जो आर्थिक लाभ घेतला आहे त्या रकमेवर त्या वर्षी जो व्याजदर असेल त्या व्याजाच्या दरानुसार महसूली थकबाकी म्हणून रक्कम वसूल करण्यात येईल.
9. संबंधित व्यावसायीक महाविद्यालयाशी संलग्न असणाऱ्या वसतिगृहात राहणाऱ्या विद्यार्थ्यांची यादी आदिवासी विकास विभागातंर्गत कार्यरत असणाऱ्या शासकीय वसतिगृहाचे गृहपाल त्या वसतिगृहातील रेक्टर कडून प्रमाणित केलेली प्रत प्राप्त करुन घेतील. व त्या जिल्हयातील संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांना माहे १५ जुलै पर्यत सादर करतील प्रकल्प अधिकारी माहे, १५ ऑगस्ट पर्यत मान्यता देवून संपूर्ण रक्कम अदा करतील.
10. ज्या ठिकाणी शासकीय मुलांमुलींची वसतिगृहे नाहीत, अशा ठिकाणी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प हे संबंधित व्यावसायीक पाठयक्रमाशी संलग्न वसतिगृहाच्या रेक्टर कडून विद्यार्थ्यांची यादी माहे १५ जुलै पर्यत प्राप्त करुन घेवून माहे, १५ ऑगस्ट, पर्यत मान्यता देवून संपूर्ण रक्कम अदा करतील.
11. जुन्या विद्यार्थ्यांच्या बाबतीत नुतनीकरणाच्या वेळी फक्त संबंधित व्यावसायीक पाठयक्रमाशी संलग्न वसतिगृहाच्या रेक्टर कडून विद्यार्थ्यांची यादी प्राप्त करुन घेवून माहे. १५ ऑगस्ट. पर्यत मंजूरी प्रदान करुन रक्कम अदा करतील.
12. व्यावसायीक पाठयक्रमाशी संलग्न असणाऱ्या सर्व विद्यार्थ्यांना केंद्रीय पुस्तक पेढी योजनेचा लाभ देण्याची जबाबदारी त्यांच्या वसतिगृहाच्या अधिक्षक/गृहपालांची तसेच संबंधित प्रकल्प अधिकारी

यांची राहील. या विद्यार्थ्यांना ग्रंथपेढीचा लाभ दिल्याची विद्यार्थीनिहाय यादी संबंधित वसतिगृहाचे अधिक्षक/गृहपाल हे संबंधित प्रकल्प अधिकारी यांना सादर करतील.

13. दिनांक १५ ऑगस्ट पर्यंत निर्वाह भत्त्याचा एखाद्या महाविद्यालयाचा प्रस्ताव प्राप्त करुन न घेतल्यास अथवा प्रस्ताव मंजूर न केल्यास तसेच निर्वाह भत्त्याचे वाटप दिनांक १५ ऑगस्ट, पर्यंत न झाल्यास संबंधित प्रकल्प अधिकारी यांना जबाबदार धरण्यात येईल. तसेच पुस्तकपेढी योजनेतून महाविद्यालयाकडून पुस्तके विद्यार्थ्यांना वाटप केली किंवा नाही, याची पाहणी शासकीय वसतिगृहाच्या अधिक्षक/गृहपालांनी करावी. पुस्तक पेढी योजनेपासुन एखाद्या विद्यार्थी वंचित राहील्यास संबंधित शासकीय वसतिगृहाचा अधिक्षक/गृहपाल व संबंधित व्यावसायीक महाविद्याल्याच्या वसतिगृहाचे अधिकक्षक/गृहपाल व संबंधित रेक्टर यांना जबाबदार धरुन कार्यवाही करण्यात येईल. पुस्तके वाटप केलयाचा अहवाल संबंधित प्रकल्प अधिकारी यांना शासकीय वसतिगृहाच्या अधिक्षक/गृहपाल हे सादर करतील. तसेच संबंधित प्रकल्प अधिकारी व अधिक्षक/गृहपाल, शासकीय वसतिगृह यानी सर्व विद्यार्थ्यांना निर्वाह भत्ता अदा करण्यात आला असून एकही महाविद्यालयातील विद्याथी लाभापासून वंचित राहीला नाही, असे प्रमाणपत्र अपर आयुक्त/आयुक्त, आदिवासी विकास. यांना सादर करतील.

****************

## परिशिष्ट-ब

(शासन निर्णय. क्रमांक आवग्-१२०४/प्र.क्र.१८/का.१२. दिनांक २८ ऑगस्ट. २००४ चे सहपत्र.)

**व्यावसायीक पाठयक्रमाशी संलग्न असणाऱ्या वसतिगृहाच्या व शासकीय वसतिगृहाच्या बाहेर राहणाऱ्या परंतू वसतिगृहात प्रवेश मिळण्यास पात्र असणाऱ्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना सुधारित निर्वाह भत्ता योजनासंदर्भातील अटी व शर्ती.**

(१) **सुधारित निर्वाह भत्ता या योजनेच्या अटी व शर्ती खालील प्रमाणे राहतील :-**

1. विद्यार्थी व्यावसायीक पाठयक्रमात प्रवेशित असावा.
2. विद्यार्थी भारत सरकार शिष्यवृत्तीधारक असावा.
3. भारत सरकार शिष्यवृत्ती योजनेस जी उत्पनाची मर्यादा आहे, तीच मर्यादा या योजनेस लागू राहील. ( रुपये १,००,०००/-) व पुढे जसजशी भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजनेच्या उत्पन्न मर्यादेत वाढ होईल त्याप्रमाणे आपोआपच लागू राहील.
4. प्रथम वर्षासाठी सक्षम अधिकाऱ्यांने दिलेले जातीचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील.
5. अनुत्तीर्ण विद्यार्थी त्या वर्षापूरता या योजनेचा लाभ मिळण्यास अपात्र ठरेल.
6. जातीचा अथवा उत्पनाचा दाखला चूकीचा आढळल्यास संबंधित लाभधारक विद्यार्थी फौजदारी गुन्हयास पात्र राहील. व लाभधारकाने जो आर्थिक लाभ घेतला आहे त्या रकमेवर त्या वर्षी जो व्याजदर असेल त्या व्याजाच्या दरानुसार महसूली थकबाकी म्हणून रक्कम वसूल करण्यात येईल.
7. अ) सदरहू विद्यार्थ्यास व्यावसायीक पाठयक्रमाशी संलग्न असणाऱ्या वसतिगृहात प्रवेश मिळाला नाही.असे प्रमाणपत्र संबंधित व्यावसायीक पाठयक्रमाशी संलग्न असणाऱ्या वसतिगृहाच्या रेक्टर कडून करुन घेण्यात यावे.

   ब) सदरहू विद्यार्थ्याने शासकीय वसतिगृहात प्रवेश मिळविण्यासाठी अर्ज केला होता पण प्रवेश मिळाला नाही याबाबतचे प्रमाणपत्र शासकीय वसतिगृहाच्या अधिक्षकामार्फत/ गृहपालांमार्फत प्राप्त करुन घेण्यात यावे.

   क) ज्या व्यावसायीक पाठयक्रमाच्या महाविद्यालयात वसतिगृहाची सोय उपलब्ध नाही अशा ठिकाणी संबंधित महाविद्यालयाच्या प्राचार्या तर्फे त्या महाविद्यालयात वसतिगृहाची सोय नाही परंतू विद्यार्थ्यांनी ------------------ या अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतला आहे असे पत्र घेण्यात यावे.

   ड) जे विद्यार्थी शासकीय वसतिगृहात प्रवेश मिळण्यास पात्र आहेत परंतू त्या विद्यार्थ्यांना शासकीय वसतिगृह व व्यावसायीक पाठयक्रमाशी संलग्न असलेल्या महाविद्यालयातील वसत्रिगृहात प्रवेश मिळाला नाही, म्हणून त्यांनी त्यांची राहण्याची सोय इतर ठिकाणी म्हणजेच खाजगी वसतिगृहात किंवा खोली भाडयाने घेवून केलेली आहे असे विद्यार्थी ज्याठिकाणी राहतात त्या ठिकाणचे किंवा घरमालकाचे प्रमाणपत्रासह विद्यार्थ्यांनी ते त्याठिकाणी राहत असल्याबाबतचे शपथपत्र (ॲफीडेव्हीट) दाखल करणे आवश्यक आहे.
8. स्थानिक विद्यार्थी किंवा स्वत:च्या घरी किंवा नातेवाईकांकडे रहाणारा विद्यार्थी या योजनेचा लाभ घेण्यास पात्र असणार नाही.

9. उपरोक्त बाबीची पूर्तता माहे १५ जुलै पर्यंत करुन घेऊन संबंधीत विद्यार्थ्यांना माहे १५ ऑगष्ट पर्यंत मान्यता देऊन संपूर्ण रक्कम अदा करण्यात यावी.

10. जुन्या विद्यार्थ्याच्या बाबतीत नुतनीकरणाच्या वेळी फक्त संबंधित व्यावसायीक पाठयक्रमाशी संलग्न वसतिगृहाच्या रेक्टर कडून विद्यार्थ्याची यादी प्राप्त करुन घेवून माहे, १५ ऑगस्ट, पर्यंत मंजूरी प्रदान करुन रक्कम अदा करण्यात यावी.

11. व्यावसायीक पाठयक्रमाशी संलग्न असणाऱ्या सर्व विद्यार्थ्यांना केंद्रीय पुस्तक पेढी योजनेचा लाभ देण्याची जबाबदारी त्यांच्या वसतिगृहाच्या अधिक्षकाची/गृहपालांची तसेच संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांची राहील. या विद्यार्थ्यांना ग्रंथपेढीचा लाभ दिल्याची विद्यार्थीनिहाय यादी संबंधित वसतिगृहाचे अधिक्षक/गृहपाल, संबंधित प्रकल्प अधिकारी यांना सादर करतील.

12. दिनांक १५ ऑगस्ट पर्यंत निर्वाह भत्याचा एखाद्या महाविद्यालयाचा प्रस्ताव प्राप्त करुन न घेतल्यास अथवा प्रस्ताव मंजूर न केल्यास तसेच निर्वाह भत्त्याचे वाटप दिनांक १५ ऑगस्ट, पर्यंत न आल्यास संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांना जबाबदार धरण्यात येईल. तसेच पुस्तकपेढी योजनेतून महाविद्यालयाकडून पुस्तके विद्यार्थ्यांना वाटप केली किंवा नाही, याची पाहणी शासकीय वसतिगृहाच्या अधिक्षक/गृहपालांनी करावी. पुस्तक पेढी योजनेपासून एखाद्या विद्यार्थी वंचित राहील्यास संबंधित शासकीय वसतिगृहाचा अधिक्षक/गृहपाल व संबंधित व्यावसायीक महाविद्याल्याच्या वसतिगृहाचे रेक्टर यांना जबाबदार धरुन कार्यवाही करण्यात येईल. पुस्तके वाटप केल्याचा अहवाल संबंधित प्रकल्प अधिकारी यांना शासकीय वसतिगृहाचे अधिक्षक/गृहपाल हे सादर करतील. तसेच संबंधित प्रकल्प अधिकारी व शासकीय वसतिगृहाचे अधिक्षक/गृहपाल हे सर्व विद्यार्थ्यांना निर्वाह भत्ता अदा करण्यात आला असून एकही महाविद्यालयातील विद्यार्थी लाभापासून वंचित राहीला नाही, असे प्रमाणपत्र अपर आयुक्त/आयुक्त, आदिवासी विकास, यांना सादर करतील.

***********